प्राध्यापक, माहिती तंत्रज्ञान, अस्वायत्त शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालय शिक्षक सेवा गट-अ या पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः उवतंशि/तांशि -१/३३/१३/९१/२०१३**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक -: २८ ऑक्टोबर, २०१६**

**पहा**:- १) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. १५(१)(१८०)/१७२१२/सात, दि.१४.०५.२०१५
२) सामान्य प्रशासन विभाग यांचे शासन परिपत्रक क्र. एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र. १५६/ कार्य- १२, दि.८/०५/२०१५.
३) या विभागाचा समक्रमांकाचा दि. ०५ जुलै, २०१६ चा शासन निर्णय

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र. ०३ येथील शासन निर्णयान्वये प्राध्यापक, माहिती तंत्रज्ञान, अस्वायत्त शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालय शिक्षक सेवा गट-अ या पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार श्री. वाघ संजीव जगन्नाथ यांची नियुक्ती करण्यात आली आहे. याच संवर्गातील आयोग पुरस्कृत अन्य उमेदवार श्री. मोहम्मद अतिक मोहम्मद जुनैद यांच्या नियुक्तीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत खालील उमेदवाराची प्राध्यापक, माहिती तंत्रज्ञान, अस्वायत्त शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालय शिक्षक सेवा गट-अ या पदावर संदर्भ क्र.०२ येथील दि.०८/०५/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार त्यांच्या नावासमोर रकाना क्र. ०६ येथे दर्शविलेल्या ठिकाणी ते ज्या दिनांकास त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र. | गुणवत्ता क्रमांक | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | १ | मोहम्मद अतिक मोहम्मद जुनैद | खुला | खुला-१ | शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड. |

०२. श्री. मोहम्मद अतिक मोहम्मद जुनैद यांचा गुणवत्ता क्रमांक संदर्भ क्रमांक ०३ येथील शासन निर्णयान्वये नियुक्ती दिलेल्या श्री. वाघ संजीव जगन्नाथ यांच्या अगोदर राहील.

०३. उपरोक्त उमेदवारास संबंधित वैद्यकीय मंडळाने वैद्यकीय दृष्ट्या शासकीय सेवेसाठी पात्र ठरविले आहे. तशी नोंद त्याच्या सेवा पुस्तकात घेण्यात यावी. तसेच उपरोक्त उमेदवाराचा चारित्र्य पडताळणी अहवाल प्राप्त झाला आहे.

०४. उपरोक्त उमेदवाराची प्राध्यापक, माहिती तंत्रज्ञान, शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालय शिक्षक सेवा गट-अ या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) सदर उमेदवाराची वेतनश्रेणी रु. ३७,४००-६७,०००/- या पे बँड व उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन निर्णय क्र. एसपीसी-२०१०/(३४/१०)/तांशि-२दि. २०/०८/२०१० मध्ये नमुद एजीपी मध्ये राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारास प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमेदवाराचे परिविक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) सदर उमेदवाराची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१ / २००१/३९, दि.७/८/२००० अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी / वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/ २००१/३९, दि. १९/३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील.

७) सदर उमेदवाराचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात यावे. महाराष्ट्र शासनाच्या सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांचे परिविक्षाधीन कालावधीतील वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ११ नुसार निश्चित करावे. महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या

नियम ३९.१ मधील पहिल्या परंतुकानुसार श्री.जुनैद यांना परिविक्षाधीन कालावधीत वेतनवाढ अनुज्ञेय राहील व त्यांचे नवीन पदावरील प्रारंभिक वेतन वित्त विभागाच्या क्र. वेतन १२८९/प्रक्र२/९०/सेवा -३ दि. १९.०३.१९९४ मधील तरतूदीनुसार संस्था स्तरावर निश्चित करण्यात यावे.

८) सदर उमेदवाराने त्यांच्या नावासमोर निर्देशिलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत तात्काळ रुजु व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही तर आयोगाने घेतलेल्या परीक्षेत त्यांनी मिळविलेल्या गुणवत्ताक्रमानुसार त्यांना अनुज्ञेय असलेली ज्येष्ठता मिळणार नाही. शिवाय प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत शासनास काहीही कळविले नाही तर, कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदरचे आदेश रद्द करण्यात येतील.

९) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अनियो १००९/ प्रक्र ३२ सेवा ४ दि. १८.०८.२००९ मधील तरतूदीनुसार दि. १ नोव्हेंबर २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि. १ नोव्हेंबर २००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. १ नोव्हेंबर २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अनियो १००६/८७/ सेवा ४, दि. १२.०१.२००७ (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित शासकीय कर्मचा-यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन१९८२) व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि. १८.०८.२००९ च्या परिपत्रकात (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचा-यांना नवीन राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू ठरतील.

१०) सदर उमेदवारांचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

११) उमेदवारास नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१२) सदर उमेदवाराने नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसुचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

०५. सदर नियुक्ती उमेदवाराने सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबुन राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्तीनंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवाराची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०६. हे आदेश प्राप्त होताच संबधित उमेदवाराने नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधित संस्थाप्रमुखाकडे सादर करावा. संस्थाप्रमुखांनी त्याबाबतचा अहवाल संचालकामार्फत शासनास सादर करावा.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१०२८१६५४०१९१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shamkant B Parnaik

Digitally signed by Shamkant B Parnaik
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shamkant B Parnaik
Date: 2016.10.28 16:58:58 +05'30'

**(शा. भा. पारनाईक)**
कार्यासन आधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

मोहम्मद अतिक मोहम्मद जुनैद, जी-१, १०१, विमको एन्क्लेव्ह, आय.जी. बंगल्याच्या समोर, अमरवती ४४४६०२.

**प्रत ,**

१) मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे).
५) सहसंचालक तंत्र शिक्षण ,विभागीय कार्यालय , पुणे.
६) प्राचार्य, शासकिय, अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड
(वरील उमेदवारास रुजू करुन घेताना त्यांच्या शैक्षणीक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन संस्थाप्रमुखांनी स्वत: खात्री करावी व सदर उमेदवारास हजर करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.)
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र२-, मुंबई
८) जिल्हा कोषागार अधिकारी ,सातारा.
९) निवड नस्ती (तांशि-१).